डॉ.पंजाबराव देशमुख कृषि विद्यापीठ, अकोला यांना ३१, सहायक अनुदाने (वेतनेतर) अंतर्गत दुष्काळग्रस्त गावांतील शालेय / महाविद्यालयीन विद्यार्थ्यांच्या परीक्षा शुल्कास माफी या बाबी करीता सन २०१६-१७ या आर्थिक वर्षात पुरवणी मागणीव्दारे मंजूर करण्यात आलेले अनुदान वितरीत करण्याबाबत.

महाराष्ट्र शासन
कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग,
शासन निर्णय क्रमांक : पंदेवि -१३१६/प्र. क्र. ९०/८-अे,
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक, मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२,
दिनांक : २० फेब्रुवारी, २०१७.

वाचा :- १) कृषि व पदुम विभाग, शासन पत्र क्रमांक - पूरक -२०१६/(प्र.क्र.९९ /१६)/२-अे, दिनांक २० ऑगस्ट,२०१६,
२) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्रमांक - पूरक -२०१६/प्र.क्र.१२८/अर्थ-३, दिनांक १२ ऑगस्ट, २०१६,
३) कृषि व पदुम विभाग, शासन निर्णय क्रमांक - पंदेवि -१३१६/प्र.क्र.९०/८-अे, दिनांक २२ सप्टेंबर,२०१६,
४) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्रमांक - अर्थसं -२०१७/प्र.क्र.८९/अर्थ-३, दिनांक ०८ फेब्रुवारी, २०१७,

**शासन निर्णय :-**

सन २०१६-१७ या आर्थिक वर्षात सन २०१५-१६ च्या रब्बी व खरीप हंगामातील पिकांची पैसेवारी ५० पैश्यापेक्षा कमी असलेल्या गावांतील शालेय / महाविद्यालयीन विद्यार्थ्यांच्या परीक्षा शुल्कास माफीसाठी डॉ.पंजाबराव देशमुख कृषि विद्यापीठ, अकोला यांना रकमांच्या अदायगीसाठी " मागणी क्रमांक डी-३, २४१५ कृषि विषयक संशोधन व शिक्षण" या मुख्य लेखाशीर्षाखाली "०१ पीक संवर्धन (२४१५ ००४३)" या उपशीर्षांतर्गत "३१,सहायक अनुदाने (वेतनेतर)" या बाबीखाली पुरवणी मागणीद्वारे मंजुर करण्यात आलेले रु.१,९२,०००/- इतक्या अनुदानापैकी ८०% च्या मर्यादेत संदर्भ क्रमांक - ३ नुसार रु. १,५३,६००/- वितरीत करण्यांत आले असून संदर्भ क्रमांक - ४ च्या परिपत्रकास अनुसरुन उर्वरित १०% रुपये १९,२००/- (अक्षरी रुपये एकोणीस हजार दोनशे फक्त) इतके अनुदान वितरीत करण्याची शासन स्तरावर विचाराधीन होती. यास अनुसरुन रुपये १९,२००/- इतके अनुदान वितरीत करण्यास खालील अटी व शर्तीच्या अधीन राहून मंजूरी देण्यात येत आहे.

**अटी व शर्ती**

१) उपलेखाशिर्षनिहाय, गटनिहाय, योजनानिहाय व बाबनिहाय वितरीत केलेला निधी कोणत्याही कारणास्तव अखर्चित / शिल्लक राहीला / राहणार असेल तर सदर अखर्चित / शिल्लक निधी शासनाचे मान्यतेशिवाय इतर गटांसाठी / योजनांसाठी / बाबींसाठी परस्पर वर्ग करु नये किंवा खर्च करु नये.

२) प्रत्येक गटामधील वितरीत केलेले सहाय्यक अनुदान आणि महसूली उत्पन्न त्या गटातील अनुज्ञेय बाबींवरील खर्च भागविण्यासाठी आणि विकास कामे करण्यासाठी उपयोगात आणावे. एका गटाचे सहायक अनुदान आणि महसूली उत्पन्न दुस-या गटातील योजनां / बाबींसाठी वर्ग करु नये. एखाद्या गटातील योजनेसाठी जास्त सहायक अनुदान वितरीत झाले असेल तर, पुढील निधीची मागणी करताना सदर जास्तीचे अनुदान विचारात घेऊन तेवढ्या कमी व अनुज्ञेय निधीची मागणी करावी.

३) प्रत्येक उपलेखाशीर्ष / गट/योजना आणि बाब निहाय स्वतंत्र लेखे / हिशोब ठेवावेत.

४) महाराष्ट्र कृषि शिक्षण व संशोधन परिषदेने विद्यापीठास मंजूर केलेले सहाय्यक अनुदान, अनुदान सुत्राप्रमाणे बरोबर आहे किंवा कसे, तसेच विहीत आदेश / कार्यपध्दतीनुसार खर्च करण्यात येत आहे किंवा कसे, याबाबत प्रत्येक आर्थिक वर्षाचा मुल्यमापन अहवाल शासनास संबंधित आर्थिक वर्ष समाप्त झाल्यापासून तीन महिन्यांच्या कालावधीत सादर करावा. तसेच, मागील आर्थिक वर्षाचा अखर्चित निधी किती आहे हे तात्काळ शासनास कळवावे.

५) कृषि विद्यापीठास त्यांचे महसूली उत्पन्न वापरण्यास शासनाने मान्यता दिलेली आहे. याबाबत विद्यापीठाने विहीत आदेश आणि कार्यपध्दतीनुसार उचित कार्यवाही करावी. तसेच महसूली उत्पन्न वाढविण्याच्या योजना राबविण्याबाबत कार्यवाही करावी.

६) पुरवणी मागणीव्दारे मंजूर केलेला निधी ज्या बाबींसाठी मंजूर केला आहे त्याच बाबींसाठी खर्च करावा व सदर निधीचे उपयोगिता प्रमाणपत्र आवश्यक कागदपत्रांसह शासनास सादर करावे.

७) विद्यापीठास मंजूर करण्यात आलेले अनुदान महाराष्ट्र कृषि विद्यापीठ अधिनियम १९८३, महाराष्ट्र कृषि विद्यापीठ परिनियम १९९०, आणि महाराष्ट्र कृषि विद्यापीठ लेखा संहिता १९९१ मधील तरतूदीप्रमाणे आणि **प्रचलित शासन आदेश व विहित कार्यपध्दतीनुसार सक्षम अधिका-यांची प्रशासकीय व वित्तीय मान्यता घेतल्यानंतर विहीत मर्यादेत खर्च करण्यात यावे. केवळ अर्थसंकल्पीय तरतूद आहे किंवा अनुदान वितरीत केले आहे म्हणून खर्च करु नये.**

८) सन २०१६-२०१७ मधील अनुदानाची मागणी करताना, विद्यापीठाने दरमहा १० तारखेपर्यंत योजनानिहाय वितरीत केलेले अनुदान, प्रत्यक्ष खर्च आणि शिल्लक अनुदान याबाबतचा अहवाल सादर करावा. यापुढे अनुदानाची मागणी सादर करताना, पूर्वी वितरीत केलेल्या अनुदानातील शिल्लकीची प्रस्तावित मागणीशी सांगड घालून, प्रत्यक्षात आवश्यक तेवढ्याच अनुदानाची मागणी करण्यात यावी.

९) नियमबाह्य योजना, पदे आणि बाबींसाठी खर्च करु नये.

१०) विद्यापीठाच्या नियंत्रक आणि इतर संबंधित सक्षम प्राधिका-यांनी उपरोक्त अटी व शर्तींचे काटेकोरपणे अनुपालन करावे.

११) उप विभागीय कृषि अधिकारी, अकोला यांनी वरीलप्रमाणे "०१ पीकसंवर्धन" (२४१५ ००४३)या उपशीर्षातर्गत मंजूर करण्यात आलेले **रुपये १९,२००/-** (**अक्षरी रुपये एकोणीस हजार दोनशे फक्त**) इतके अनुदान शासन निर्णय क्रमांक कृषि व सहकार विभाग क्रमांक अेजीयु-१०७२/१८४७१/व्ही, दिनांक २७ सप्टेंबर १९७२ आणि शासन निर्णय क्रमांक कृषिवि- २००३/सीआर-३५/२०-अे, दिनांक २५/४/२००३ मध्ये नमूद केल्याप्रमाणे नियंत्रक, डॉ.पंजाबराव देशमुख कृषि विद्यापीठ, अकोला यांना अदा करण्याबाबत आवश्यक कार्यवाही करावी.

१२) या प्रित्यर्थचा खर्च सन २०१६-२०१७ च्या अंदाजपत्रकात खालील लेखाशीर्षाखाली मंजूर केलेल्या तरतूदीतून मासिक निधी विवरणपत्राच्या मर्यादेत भागवावा व त्याच लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

| मंजूर अनुदान | लेखाशिर्ष |
|---|---|
| रु. १९,२००/- | मागणी क्रमांक डी-३<br>२४१५ कृषि विषयक संशोधन व शिक्षण<br>०१ पीकसंवर्धन, १२०, इतर संस्थांना सहाय्य<br>(००) (०३) डॉ.पंजाबराव देशमुख कृषि विद्यापीठाला सहाय्यक अनुदान<br>३१, सहायक अनुदान (वेतनेतर) दत्तमत (२४१५ ००४३) |

हे आदेश महाराष्ट्र अर्थसंकल्प नियम पुस्तिका (भाग-१) १९७७ मधील परिच्छेद १४२, १४४ व १६२ (अ) अन्वये प्रशासकीय विभागांना प्रदान केलेल्या शक्तीनुसार व शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्रमांक-पूरक -२०१६/प्र.क्र.१२८/अर्थ-३, दिनांक १२ ऑगस्ट, २०१६ तसेच शासन परिपत्रक, वित्त विभाग,क्रमांक-अर्थसं-२०१६/प्र.क्र. ८९/अर्थ-२, दिनांक २०/०४/२०१६, वित्त विभाग,क्रमांक - अर्थसं-२०१७ / प्र.क्र. ८९/अर्थ-३, दिनांक ०८/०२/२०१७, तसेच वित्त विभागाचा अनौ.सं.क्र.९८/अर्थ-१३, दिनांक ०७/०२/२०१७ अन्वये प्राप्त मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहेत.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध करुन देण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक क्रमांक २०१७०२२२११३८१३२९०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,**

Prakash Shankar Shete

Digitally signed by Prakash Shankar Shete
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Deputy Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Prakash Shankar Shete
Date: 2017.02.22 11:39:18 +05'30'

**(प्र.शं.शेटे)**
**उपसचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रति,**

१. महासंचालक / सल्लागार (वित्त), महाराष्ट्र कृषि शिक्षण व संशोधन परिषद, पुणे,
२. कुलगुरु, डॉ.पंजाबराव देशमुख कृषि विद्यापीठ, अकोला, जिल्हा - अकोला,
३. कुलसचिव, डॉ.पंजाबराव देशमुख कृषि विद्यापीठ, अकोला, जिल्हा - अकोला,
४. नियंत्रक, डॉ.पंजाबराव देशमुख कृषि विद्यापीठ, अकोला, जिल्हा - अकोला,
५. कृषि आयुक्त, (अेजी १० सेल) महाराष्ट्र राज्य, पुणे (खर्च ताळमेळ शाखा),
६. महालेखापाल, महाराष्ट्र १ / २ (लेखापरिक्षा / लेखा व अनुज्ञेयता) मुंबई / नागपूर,
७. जिल्हा कोषागार अधिकारी, अकोला / उपकोषागार अधिकारी, अकोला, जिल्हा - अकोला,
८. मुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, कोकण भवन, नवी मुंबई,
९. उप मुख्य लेखा परिक्षक (वरिष्ठ) स्थानिक निधी लेखा, कोकण भवन, नवी मुंबई,
१०.जिल्हा लेखा परिक्षा अधिकारी, स्थानिक निधी लेखा, डॉ.पंजाबराव देशमुख कृषि विद्यापीठ, अकोला,
११.अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई / निवासी लेखापरिक्षा अधिकारी, मुंबई,
१२.वित्त विभाग (व्यय १ / अर्थ-१३), मंत्रालय, मंबई - ४०० ०३२,
१३.कक्ष अधिकारी, कार्यासन २अे / ६अे / ७अे, कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२,
१४.कार्यासन ८-अे (निवडनस्ती), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.